**परभणी शहर महानगरपालिकेमधील कंत्राटी अभियंता/स्थापत्य अभियांत्रिकी सहाय्यक यांचे महानगरपालिकेच्या सेवेत नियमित समावेशन करण्याकरीता पदे निर्माण करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्र: पमपा-२०२०/प्र.क्र.८२/नवि-२४**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक:- २८ जानेवारी, २०२२

वाचा:-१) परभणी महानगरपालिका सर्वसाधारण सभा ठराव क्र. १४७ दि. २५.७.२०१८
२) शासन निर्णय, नगर विकास विभाग,समक्रमांक दि.३०.९.२०२१
३) आयुक्त, परभणी शहर महानगरपालिका यांचे पत्र क्र. कावि-३/प्रशासन/३८०/२०२१ दि.१२.११.२०२१

## शासन निर्णय :-

परभणी शहर महानगरपालिकेतील १६ कंत्राटी अभियत्यांच्या (उप अभियंता, शाखा अभियंता, कनिष्ठ अभियंता व इतर) यांच्या नियमित समावेशनास शासन निर्णय दि. ३०.९.२०२१ अन्वये शासनाची मान्यता देण्यात आलेली आहे. तथापि, दरम्यानच्या काळात परभणी शहर महानगरपालिकेचे पदांचे सेवाप्रवेश नियम निश्चित केल्यामुळे पदोन्नती व सरळ सेवा संवर्गात पदे विभागली गेली, त्यामुळे संबंधित कंत्राटी अभियत्यांचे महानगरपालिकेच्या सेवेत नियमित समावेशन करण्यासाठी अधिसंख्य पदे निर्माण करण्याचा प्रस्ताव आयुक्तांनी संदर्भाधीन दि.१२.११.२०२१ च्या पत्रान्वये शासनास सादर केला आहे.

२. परभणी शहर महानगरपालिकेच्या संदर्भाधीन दिनांक १२.११.२०२१ च्या प्रस्तावात नमूद केल्याप्रमाणे परभणी शहर महानगरपालिका आस्थापनेवर सरळसेवा संवर्गात खालील पदे निर्माण करण्यात येत असून, संदर्भाधीन शासन निर्णय दि.३०.९.२०२१ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार पुढील कार्यवाही करण्यात यावी.

| अ. क्र | पदनाम | वेतनश्रेणी | पदसंख्या |
|---|---|---|---|
| १. | उप अभियंता (स्थापत्य) | रु. १५६९०- ३९१०० (ग्रेड-पे रु. ५४००) | २ |
| २. | शाखा अभियंता (स्थापत्य) | रु. ९३००-३४८०० (ग्रेड पे-४४००) | ४ |
| ३. | स्थापत्य अभियांत्रिकी सहाय्यक | रु.५२००-२०२०० (ग्रेड पे-२४००) | १ (खुला संवर्ग) |
| | | एकुण | ७ |

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्यांचा सांकेतांक क्र. २०२२०१२८१७५७४१६०२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल्य यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Vidya Ramappa Hampayya
Date: 2022.01.28 17:58:08 +05'30'

**(विद्या हम्पय्या)**
**उप सचिव , महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. मंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव
२) महापौर, परभणी शहर महानगरपालिका, परभणी
३) आयुक्त, परभणी शहर महानगरपालिका, परभणी
४) मा. प्रधान सचिव (नवि-२) यांचे स्वीय सहाय्यक
५) उप आयुक्त (प्रशासन) परभणी शहर महानगरपालिका, परभणी
६) निवडनस्ती (नवि-२४)